गोपनीय/तत्काळ

सरकारी/निमसरकारी कर्मचारी व शिक्षक यांचा दिनांक १५ सप्टेंबर १९८७ रोजीचा नियोजित लाक्षणिक संप.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक: एसटीके-१०८७/२०३९/सीआर-२५/तीरा-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ११ सप्टेंबर, १९८७.

परिपत्रक

सरकारी/निमसरकारी कर्मचारी आणि शिक्षक संघटना, महाराष्ट्र राज्य यांच्या समन्वय समितीने दिनांक १५ सप्टेंबर १९८७ रोजी एक दिवसाचा लाक्षणिक संप करण्याचे कर्मचाऱ्यांना व शिक्षकांना आवाहन केले आहे. शासन सर्व कर्मचाऱ्यांच्या असे नजरेस आणू इच्छिते की, ह्या संपात भाग घेण्याची कृती ही गैरवर्तणूक समजण्यात येईल व संपात भाग घेणाऱ्या शासकीय कर्मचाऱ्यांवर शिस्तभंग विषयक कार्यवाही करण्यात येईल. सर्व विभाग प्रमुख आणि कार्यालय प्रमुख यांनी त्यांच्या विभाग/कार्यालयातील कर्मचाऱ्यांच्या माहितीस्तव वरीलप्रमाणे सूचना प्रसृत करणारे कार्यालयीन आदेश [Office Orders] तत्काळ काढावेत आणि ते संबंधित कर्मचाऱ्यांचे नजरेस आणावेत. त्याचप्रमाणे आदेशाची प्रत सर्व कर्मचाऱ्यांच्या माहितीस्तव सूचना फलकावरही लावावी.

२. सर्व मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांच्या वरील आदेश निदर्शनास आणून योग्य ती कार्यवाही करण्याबाबत सूचना द्याव्यात अशी त्यांना विनंती करण्यात येत आहे.

प्र. द. माळवे,
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

मुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्र्यांचे खाजगी सचिव/सर्व राज्यमंत्र्यांचे खाजगी सचिव,
शासनाचे सर्व सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
मंत्रालयाच्या विविध विभागांच्या नियंत्रणाखालील इतर सर्व विभाग प्रमुख,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, [मूळ न्याय शाखा], मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, [अपील शाखा], मुंबई,
* प्रबंधक, लोकायुक्त / उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग.

*प्रत पत्राद्वारे.

---

शा. म. मु. रोटा/स्थ-६३६[ब][६००-९-८७]